**मौजे सांवगी (येंडे) ता. देवळी जि. वर्धा येथील पूरग्रस्तांचे पुनर्वसन करण्याकरीता संपादित जमीनीचा वाढीव मोबदला अदा करण्यास्तव निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. मावेजा-२०२५/प्र.क्र. ४३/र-१२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक- २९ मार्च, २०२५

<u>वाचा -</u>

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अ.क.वा./न्यायप्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-२, दि. २४/१२/२००३
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र.:-बीयुडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि. ९/३/२०१८
३) उपायुक्त (महसूल) नागपूर विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. मशा/कार्या-७ (३)/प्र.क्र. ५८/२०२२, दि. ३०.०८.२०२४

<u>प्रस्तावना :-</u>

मौजे सांवगी (येंडे) ता. देवळी जि. वर्धा येथील पूरग्रस्तांचे पुनर्वसन करण्याकरीता श्री. अशोक रुपराव येंडे यांचे मालकीचे मौजे देवळी ता. देवळी जि. वर्धा येथील शेत सर्व्हे नं. ४८ आराजी ३.७९ हे.आर. जमीन संपादीत करण्यात आली आहे. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर येथे दाखल प्रथम अपील क्र. २२४/२०१० मध्ये दि. ०५.०२.२०१९ रोजी आदेश पारित करुन वाढीव मोबदला अदा करण्याबाबत निर्देश प्राप्त झाले आहेत. त्या अनुषंगाने सदर प्रकरणात भूधारक श्री. अशोक रुपराव येंडे यांना मा. उच्च न्यायालय, नागपूर यांचे आदेशानुसार वाढीव मोबदला अदा करण्यासाठी उपायुक्त (महसूल) नागपूर विभाग, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भूसंपादन प्रकरण क्रमांक एलएक्यू- ४७/२००२-२००३, मौजे सावंगी (येंडे) ता. देवळी जि. वर्धा मध्ये भूधारक अशोक रुपराव येंडे यांना भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ अन्वये वाढीव मोबदला अदा करण्यास्तव उपायुक्त (महसूल) नागपूर विभाग, नागपूर यांनी मागणी केल्यानुसार रक्कम रूपये २९,७०,७११/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष सत्तर हजार सातशे अकरा फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांना रूपये २९,७०,७११/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष सत्तर हजार सातशे अकरा फक्त) इतका निधी BEAMS प्रणालीवर निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, मदत व पुनर्वसन/कक्ष अधिकारी (म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी.

३. भूसंपादन प्रकरण क्रमांक एलएक्यू- ४७/२००२-२००३, मौजे सावंगी (येंडे) ता. देवळी जि. वर्धा मध्ये भूधारक अशोक रुपराव येंडे यांना भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ अन्वये

वाढीव मोबदला अदा करण्यासाठी सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये २९,७०,७११/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष सत्तर हजार सातशे अकरा फक्त) एवढा निधी "मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२-पूर चक्रीवादळे, (९३) इतर (९३) (०३) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, घरे इ. बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१८२)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, नागपूर यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**४. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, नागपूर यांनी भूधारकास अदा करण्यासाठी परिगणना केलेली वाढीव मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करुन, उपलब्ध करुन दिलेली उपरोक्त रक्कम भूधारकास तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, नागपूर यांनी मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही यांची विभागीय आयुक्त यांनी दक्षता घ्यावी.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला निधीपेक्षा जास्त निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/ PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास सादर करण्यात यावा. उपरोक्त निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास सादर करावीत.

८) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

९) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/PLA (स्वीय प्रपंजी खाते) मध्ये जमा करुन ठेवण्यात येणार नाही याची संबंधित

अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

१०) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनूसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नंतर या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादी कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक १८८/२०२५/व्यय-९, दि. २०.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतिक क्रमांक २०२५०३२९१५११४१८६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2025.03.29 15:12:32 +05'30'

**(संजय जगताप)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रक अधिकारी (पुनर्वसन), नागपूर
२. उप आयुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
३. जिल्हाधिकारी, वर्धा
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई /नागपूर
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) -१/२, मुंबई /नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा
७. महसूल व वन विभाग कार्यासन ब-१/ अ-४/पीएसी/ म-११, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती र-१२

****